**अॅड. श्री. प्रविण चव्हाण, विशेष सरकारी अभियोक्ता यांना व्यावसायिक फी प्रदान करण्याबाबत...**
**शिवाजीनगर पो. स्टे. पुणे शहर गु. र. क्र. २६/२०२० अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवणा-या न्यायालयीन प्रकरणी मा. विशेष व एमपीआयडी न्यायालय, शिवाजीनगर, पुणे व मा. उच्च न्यायालय, मुंबई या न्यायालयातील कामकाजासाठी.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एसपीपी ०३२१/प्र.क्र.६६/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
२ रा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २१ ऑक्टोबर, २०२१

**संदर्भ**:- १. शासन अधिसूचना, विधी व न्याय विभाग क्र. एसपीपी२०२१/यु.ओ.आर.३७/का-१४, दि.३/६/२१.
२. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दि. २९/७/२०१५
३. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दि. १६/६/२०१७

**शासन निर्णय** :-

शिवाजीनगर पो.स्टे. पुणे शहर, गु.र.क्र.२६/२०२० अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवणा-या न्यायालयीन प्रकरणी मा. विशेष व एमपीआयडी न्यायालय, शिवाजीनगर, पुणे व मा. उच्च न्यायालय, मुंबई या न्यायालयात शासनाची बाजू मांडण्यासाठी उपरोक्त संदर्भ क्र.१ अन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त अॅड. श्री. प्रविण चव्हाण यांना खालीलप्रमाणे फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**मा. विशेष व एमपीआयडी न्यायालय, शिवाजीनगर, पुणे व मा. उच्च न्यायालय, मुंबई**

अ) प्रतिदिन न्यायालयीन परिणामकारक सुनावणी फी - रुपये ५०,०००/-
ब) विचारविनिमय फी (प्रति तास) - रुपये ५,०००/-
(कमाल मर्यादा प्रति दिन - रुपये ३०,०००/-)
क) निवास व्यवस्था- रिक्रेशन हॉल, पोलिस जिमखाना किंवा शासकीय विश्रामगृह.

सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ अॅड. श्री. प्रविण चव्हाण यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकांकडून तपासून, प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त/ पोलीस अधिक्षक यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) (१०८), राज्य पोलीस मुख्यालय (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक व विशेष सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र. ४६८/२०२१/व्यय-७, दि.०७/०७/२०२१ अन्वये प्राप्त शासन मान्यतेनुसार तसेच संदर्भ क्र. २ व ३ वरील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२११५१२३००२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tushar Dilip Rathod

Digitally signed by Tushar Dilip Rathod
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e7e9706be693397ead11bd0e0b8fbaec45488529c8b57466dbf3e7c095089c08, pseudonym=E5959DAF1A16023D678D1801FC611F35E4BD65FF, serialNumber=B88BABB31CB2C1163B5A1E41E86D809272FEA914814734600D0B42642848C06F, cn=Tushar Dilip Rathod
Date: 2021.10.21 15:13:13 +05'30'

**(तुषार दि. राठोड)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. पोलीस आयुक्त, पुणे शहर.
२. अपर पोलीस आयुक्त (गुन्हे), पुणे शहर.
३. पोलीस उपायुक्त, शिवाजीनगर पोलीस ठाणे, पुणे शहर.
४. वरीष्ठ पोलीस निरीक्षक, शिवाजीनगर पोलीस ठाणे ,पुणे शहर.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे शहर.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, पुणे शहर.
८. ॲड. श्री. प्रविण चव्हाण, १०२, मातृकृपा अपार्टमेंट, मॉडेल कॉलनी, ॲम्बेसेडर हॉटेल जवळ, पुणे
९. कक्ष अधिकारी, विधी व न्याय विभाग (कार्या-१४), मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती (पोल-१०).